**मोटार वाहन विभागातील अधिकारी/ कर्मचारी यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षानंतर, सेवा पुनर्विलोकन करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय क्रमांकः- एमव्हिडी-०८२०/प्र.क्र.१७२/परि-४,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :-०६ नोव्हेंबर, २०२०

**वाचा:-१)** शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एलपीएल-२०१७/प्र.क्र.२१/का.पंधरा, दि.१०.०६.२०१९.

२) गृह विभाग, शासन निर्णय क्र. एमव्हिडी-०७१९/प्र.क्र.१७१/परि-४, दि. ०२.०८.२०१९.

३) विभागीय पुनर्विलोकन समितीची बैठक दि. १३.०२.२०२०.

**प्रस्तावना-**

महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ चा नियम १०(४) व नियम ६२ नुसार सार्वजनिक हितास्तव अकार्यक्षम व संशयास्पद सचोटीच्या अधिकारी / कर्मचा-यांना वयाच्या ५०/५५ व्या वर्षी अथवा ३० वर्ष अर्हताकारी जे आगोदर घडेल त्यावेळी, सेवा पुनर्विलोकन करुन त्यांना शासन सेवेतून मुदतपूर्व सेवानिवृत करावे असे शासनाचे धोरण आहे. त्याअनुषंगाने सामान्य प्रशासन विभागाने संदर्भ क्र. १ येथील दि.१०.०६.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये सेवापुनर्विलोकनासंबंधी कार्यपद्धती व सर्वसाधारण सूचना विहित केलेल्या आहेत. त्यास अनुसरून, मोटार वाहन विभागातील १) गट-अ (राजपत्रित) (वरिष्ठ वेतनश्रेणी) ग्रेड वेतन ७६०० व त्यापेक्षा अधिक परंतु १०००० पेक्षा कमी संवर्गातील अधिकारी, २) गट-अ (राजपत्रित) (कनिष्ठ वेतन श्रेणी) ग्रेड वेतन ७६०० पेक्षा कमी संवर्गातील अधिकारी तसेच ३) गट-ब (राजपत्रित) संवर्गातील अधिकारी यांच्या सेवापुनर्विलोकनाकरिता संदर्भ क्र. २ येथील दिनांक ०२.०८.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये अपर मुख्य सचिव (परिवहन) यांच्या अध्यक्षतेखाली विभागीय पुनर्विलोकन समितीची स्थापना करण्यात आली आहे.

मोटार वाहन विभागातील प्रादेशिक परिवहन अधिकारी गट अ संवर्गातील अधिका-यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षी अथवा ३० वर्ष अर्हताकारी सेवा यापैकी जे अगोदर घडेल त्यावेळी त्यांचे सेवापुनर्विलोकन करण्यासाठीचा विहित प्रस्ताव अपर मुख्य सचिव (परिवहन) यांचे अध्यक्षतेखालील विभागीय पुनर्विलोकन समितीच्या दिनांक २२.१०.२०२० रोजीच्या बैठकीत सादर करण्यात आला. विभागीय पुनर्विलोकन समितीने सदर अधिका-यांच्या सेवेचे मुल्यमापन करुन केलेल्या शिफारशी नुसार ज्या अधिका-यांना वयाच्या ५०/५५ व्या वर्षी अथवा ३० वर्ष अर्हताकारी सेवा यापैकी जे अगोदर घडेल त्यावेळी सेवेत राहण्यासाठी पात्र ठरविले आहे त्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

विभागीय पूनर्विलोकन समितीच्या दिनांक २२.१०.२०२० रोजी झालेल्या बैठकीतील शिफारशीनुसार अनुसरुन मोटार वाहन विभागातील प्रादेशिक परिवहन अधिकारी, गट अ संवर्गातील सोबत जोडलेल्या प्रपत्रामध्ये नमुद केलेल्या अधिका-यांची सेवा त्यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षी अथवा ३० वर्ष अर्हताकारी सेवा यापैकी जे अगोदर घडेल त्यानंतर चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सोबत जोडलेल्या प्रपत्रामध्ये नमुद अधिका-यांची सेवा ५०/५५ वर्षानंतर किंवा अर्हताकारी सेवेची ३० वर्ष पूर्ण झालेनंतर पुढे चालू ठेवण्यास मान्यता मिळाल्याबाबत नोंद त्यांच्या सेवापुस्तकात घेण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०११०६११५३१९६४२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KADAM DATTATRAY HANMANT

Digitally signed by KADAM DATTATRAY HANMANT
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=cf316337e92d3c54da432222208093bfc6ed1d1570f094663515273d0b4d27fc, postalCode=400032, street=HOME DEP.MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=a923979cf886d5724fbed87cd57745c3f72eba57b0d277f11e970f0aaca99802, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=KADAM DATTATRAY HANMANT
Date: 2020.11.06 12:14:29 +05'30'

**( द. ह. कदम )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:**

१) महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
२) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई / नागपूर.
३) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) परिवहन उप आयुक्त (प्रशासन), परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई.
५) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) संबंधित प्रादेशिक परिवहन अधिकारी (परिवहन आयुक्त यांचे मार्फत)
७) निवडनस्ती (परि-४).

**शासन निर्णय क्रमांक एमव्हिडी-०८२०/प्र.क्र.१७२/परि-४, दिनांक ०६ नोव्हेंबर, २०२० सोबतचे प्रपत्र मोटार वाहन विभागातील प्रादेशिक परिवहन अधिकारी, गट अ संवर्गातील अधिका-यांच्या वयाच्या ५०/५५ वर्षानंतर किंवा अर्हताकारी सेवेची ३० वर्ष पूर्ण झालेनंतर सेवा पुढे चालू ठेवण्यास पात्र ठरलेल्या अधिका-यांची यादी**

| **अ.क्र.** | **अधिका-यांचे नाव** |
|---|---|
| १ | श्री. लक्ष्मण दराडे |
| २ | श्री. अमर आ. पाटील |
| ३ | श्री. अभय देशपांडे |
| ४ | श्री. पुरुषोतम निकम |
| ५ | श्री. भरत कळसकर |
| ६ | श्री. रामभाऊ गिते |
| ७ | श्री. राजेंद्र मदने |

**********